**विद्युत अपघात/ जळीत पीक प्रकरणी अपघातग्रस्त/ नुकसानग्रस्त व्यक्तीस नुकसान भरपाई मिळण्यासाठी करावयाच्या कार्यवाहीबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण-२०१७/प्र.क्र. ७९/ऊर्जा-५**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०४ मार्च, २०१७

**शासन परिपत्रक :**

विद्युत अधिनियम, २००३ मधील कलम १६१ व अपघात सूचना (फॉर्म आणि सूचना सेवाकाळ) नियम, २००४ मध्ये प्राणांतिक/अप्राणांतिक अपघात/जळीत पीक नुकसान या प्रकरणी कार्यवाही करण्याची तरतूद आहे. सदर तरतुदीनुसार क्षेत्रीय स्तरावर विद्युत निरीक्षक व महावितरण कंपनीचे अधिकारी यांनी करावयाच्या कार्यवाहीबाबत अनुक्रमे मुख्य विद्युत निरीक्षक व महावितरण कंपनीने आदेश/परिपत्रके निर्गमित केली आहेत. परंतु क्षेत्रीय स्तरावर सदर कार्यपध्दतीमध्ये दोन्ही कार्यालयांमध्ये सूसुत्रता नसल्याने अशा प्रकरणांमध्ये अपघातग्रस्त व नुकसानग्रस्त व्यक्तीस नुकसान भरपाईची रक्कम वेळेवर मिळत नसल्याच्या तक्रारी शासनास प्राप्त होतात. अशा प्रकरणांमध्ये तातडीने कार्यवाही होण्याच्या दृष्टीने तसेच दोन्ही कार्यालयांमध्ये समन्वय राहण्याच्या दृष्टीने कार्यपध्दती निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरून खालीलप्रमाणे कार्यपध्दती विहीत करण्यात येत आहे:-

| अ. क्र. | सूचना देणारा अधिकारी | नियमातील तरतूद | सूचना कोणाला द्यावी |
|---|---|---|---|
| १ | वीज निर्मिती, पारेषण, वीज पुरवठाकार (लायसन्सी) यांचे प्राधिकृत प्रतिनिधी किंवा त्यांचा कमीत-कमी कनिष्ठ अभियंता अथवा समकक्ष दर्जाचा अधिकारी किंवा विद्युत संचमांडणीचा मालक | (अ) अपघात/जळीत पीक प्रकरण झाल्याचे कळाल्या-पासून २४ तासाच्या आत अपघाताची सूचना दूरध्वनी, भ्रमणध्वनी किंवा ई-मेलव्दारे देणे.<br>(ब) ४८ तासाच्या आत अपघाताची/जळीत पीक प्रकरणाची सविस्तर माहिती केंद्र शासनाच्या अपघात सूचना नियम, २००४ मधील विवरणपत्र नमुना-अ मध्ये पाठविणे. | संबंधित जिल्हयाचे विद्युत निरीक्षक.<br>संबंधित जिल्हयाचे विद्युत निरीक्षक |
| २ | **विद्युत निरीक्षक कार्यालयास वरील सूचना प्राप्त झाल्यानंतर** | | |
| | **विद्युत निरीक्षकाने करावयाची कार्यवाही** | | **विहीत कालमर्यादा** |
| | प्रत्यक्ष अपघात/जळीत पीक प्रकरण स्थळास भेट देऊन प्राथमिक चौकशी करणे | | विद्युत अपघात घडल्यापासून ४८ तासात |

| | | | |
|---|---|---|---|
| | प्राथमिक चौकशी अहवाल तयार करणे | विद्युत अपघात घडल्यापासून ८ दिवस | |
| | जबाब नोंदविणे, पोलीस पंचनामा प्राप्त करुन घेणे, शव विच्छेदन अहवाल प्राप्त करुन घेणे. जळीत पीक प्रकरणी सक्षम प्राधिकाऱ्याचा अहवाल प्राप्त करून घेणे. | ३० दिवस | |
| | संबंधितांवर कारणे दाखवा नोटीस बजाविणे, दोषारोप पत्रे देणे. | ५ दिवस | |
| | अपघाताचा/जळीत पीक प्रकरणाचा अभिप्राय संबंधित महावितरण कंपनीस कळविणे, नुकसान भरपाई देण्याबाबत जबाबदारी निश्चित करुन संबंधितास कळविणे, पोलीसांनी मागणी केल्यास पोलीस ठाण्यास अभिप्राय कळविणे. | ५ दिवस | |
| | **एकूण -** | **५० दिवस** | |
| ३ | **महावितरण कंपनीने करावयाची कार्यवाही** | **विहीत कालमर्यादा** | **ऑनलाईन कार्यवाही** |
| | **अ) <u>कनिष्ठ शाखा / सहाय्यक अभियंता यांनी करावयाची कार्यवाही</u>**<br>(१) प्रत्यक्ष अपघात/जळीत पीक प्रकरण स्थळास भेट देऊन प्राथमिक चौकशी<br>(२) स्थळ पाहणी अहवाल, नकाशा व फोटोसह तयार करणे<br>(३) उपविभागीय कार्यालयास अहवाल सादर करणे | विद्युत अपघात घडल्यापासून २४ तासात | निरंक |
| | **ब) उपविभागीय कार्यालयाने करावयाची कार्यवाही** | | |
| | (१) कनिष्ठ /सहाय्यक अभियंत्यांने दिलेली माहिती पोर्टलवर अपलोड करणे.<br><br>(२) अपघाताचे/जळीत पीक प्रकरणाचे सविस्तर विवरणपत्र नमुना-अ मधील विद्युत निरीक्षकास पाठविणे<br><br>(३) महावितरण कंपनीच्या प्रचलित नियमानुसार अपघातग्रस्त व्यक्तीच्या कायदेशिर वारसास तात्काळ तात्पुरते आर्थिक सहाय्य देणे.<br><br>(४) अर्जदार/कायदेशिर वारसदार यांना नुकसान भरपाई मिळण्यासाठी त्यांनी सादर करावयाच्या कागदपत्राची यादी व त्याबाबतची पोचपावती | विद्युत अपघात घडल्यापासून २४ तासात<br><br>विद्युत अपघात घडल्यापासून २४ तासात<br><br>विद्युत अपघात घडल्यापासून २४ तासात<br><br>त्याच दिवशी | स्थळ पाहणी अहवाल, फोटो व नकाशा<br><br>नमुना-अ<br><br>आर्थिक सहाय्य दिल्याची पोचपावती<br><br>दस्ताऐवजांची पोचपावती |

| | | | |
|---|---|---|---|
| | (५) अर्जदार/कायदेशीर वारसदार यांचेकडून नुकसान भरपाई मिळण्याबाबतचा अर्ज व अनुषांगिक दस्ताऐवज प्राप्त करणे.<br>(६) विद्युत निरीक्षकाचा अहवाल / पिकांच्या नुकसानीबाबतचा सक्षम प्राधिकाऱ्याचा अहवाल व दस्ताऐवजांची पडताळणी करुन विभागीय कार्यालयास पाठविणे | ३ दिवस<br>७ दिवस | अर्ज व दस्ताऐवज<br>स्वयंस्पष्ट अहवाल |
| | **क) विभागीय कार्यालयाने करावयाची कार्यवाही**<br>(१)दस्ताऐवजांची तपासणी/पडताळणी<br>(२) निष्कर्ष अहवाल नमुना क्र.३ स्वयंस्पष्ट टिप्पणीसह<br>(३) नुकसान भरपाई अहवालाचे लेखा परीक्षण<br>(४) नुकसान भरपाई प्रस्ताव मंडळ कार्यालयास पाठविणे | ७ दिवस | तपासणी केलेले दस्ताऐवज<br>निष्कर्ष अहवाल व स्वयंस्पष्ट टिप्पणी<br>लेखा परिक्षित परिगणना अहवाल<br>प्रस्ताव |
| | **ड) मंडळ कार्यालयाने करावयाची कार्यवाही**<br>(१)दस्ताऐवजांची तपासणी/पडताळणी<br>(२) लेखापरिक्षण करणे<br>(३) प्रस्तावास मंजुरी देणे व मंजूर प्रस्ताव विभागीय कार्यालयास पाठविणे | ७ दिवस | तपासणी केलेले दस्ताऐवज<br>अंतिम लेखापरिक्षित अहवाल<br>मंजूर प्रस्ताव |
| | **इ)विभागीय कार्यालयाने करावयाची कार्यवाही**<br>(१) मंडळ कार्यालयाकडून मंजूर प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर नुकसान भरपाई निधी मागणी मुख्य कार्यालयास करणे<br>(२) नुकसान भरपाई निधी वितरण करणे | ४ दिवस<br>३ दिवस (निधी प्राप्त झाल्यावर) | निधी मागणी<br>निधी रक्कम व पोचपावती |
| | **ई) पीक जळीत प्रकरणी मुख्य कार्यालयाने करावयाची कार्यवाही**<br>(१) नुकसान भरपाई प्रस्तावास मंजुरी व निधी उपलब्ध करणे | ७ दिवस | नुकसान भरपाई रक्कम व दिल्याची पोचपावती |

यापुढे उपरोक्त विहीत कार्यपध्दतीनुसार विद्युत अपघात/पीक जळीत प्रकरणी कार्यवाही करण्याच्या सूचना, मुख्य विद्युत निरीक्षक व महावितरण कंपनीने त्यांच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालयांना द्याव्यात तसेच सदर कार्यपध्दतीचे लवकरात लवकर संगणकीकरण करून ऑनलाईन प्रक्रिया राबविण्यात यावी. मुख्य विद्युत निरीक्षक व महावितरण कंपनीने ऑनलाईन प्रणालीची एकमेकांशी सांगड घालून अशा प्रकरणांवर विहित कालमर्यादेत कार्यवाही होईल यादृष्टीने नियंत्रण ठेवावे. विद्युत अपघात/पीक जळीत प्रकरणी क्षेत्रीय स्तरावर प्रत्येक जिल्ह्यातील विद्युत निरीक्षक व महावितरण कंपनीचे संबंधित अधिक्षक अभियंता यांनी दर महिन्यास आढावा बैठक घ्यावी व मुख्य अभियंता, महावितरण यांनी दर तीन महिन्यांस आढावा बैठक घ्यावी. तसेच महावितरण कंपनीने मुख्यालय स्तरावर मुख्य विद्युत निरीक्षकांसोबत दर चार महिन्यास आढावा बैठक घेऊन सर्व प्रलंबित प्रकरणे निकाली काढण्याच्या दृष्टीने कार्यवाही करावी व त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

२. हे शासन परिपत्रक, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१७०३०४१८२२२९२१० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhimashankar Yallappa Manta

Digitally signed by Bhimashankar Yallappa Manta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries,Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=873ce9a279d9561ff0cbf658e05b823c67c79dcac309fc4ebdac035d6aeec2a0, cn=Bhimashankar Yallappa Manta
Date: 2017.03.04 18:24:01 +05'30'

**( भि.य.मंता )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. मा.मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. उर्वरित सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई
७. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
८. सर्व मंत्रालयीन विभाग
९. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनी,प्रकाशगड, बांद्रा(पूर्व), मुंबई-५१

१०. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी,प्रकाशगड,बांद्रा(पूर्व), मुंबई-५१
११. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य वीज पारेषण कंपनी,प्रकाशगंगा,बांद्रा(पूर्व), मुंबई-५१
१२. मुख्य विद्युत निरीक्षक, मुख्य कार्यालय, चेंबूर
१३. सर्व कार्यासने (ऊर्जा), मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१४. निवडनस्ती- ऊर्जा-५.